मिशन ऑक्सिजन स्वावलंबन अंतर्गत उत्पादन उद्योगांना उत्पादनात जाण्यासाठी विहित करण्यात आलेल्या कालावधीस मुदतवाढ देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग
शासन निर्णय क्रमांक : साप्रोयो-२०२१/ प्र.क्र. ८२/ उद्योग-८
दिनांक- ०८ एप्रिल,२०२४

**संदर्भ**: - १) शासन निर्णय समक्रमांक दि.२१ मे,२०२१.
२) उद्योग संचालनालय परिपत्रक क्र.उसं/साप्रोयो/मिशन ऑक्सिजन/मार्गदर्शक तत्वे/२०२१/A- ५३७,दि.०९.०६.२०२१
३) शासन शुध्दीपत्रक क्र. पीएसआय-२०१३/सीआर-५४/उद्योग-८, दि.०७.०५.२०१६
४) शासन पूरक पत्र क्र. साप्रोयो २०२१/ प्र.क्र. ८२/ उद्योग-८, दि.०२.०२.२०२२
५) उसं/साप्रोयो/मिशन ऑक्सिजन स्वावलंबन/मुदतवाढ प्रस्ताव/२०२२/अे-१०१७, दि.२३.०८.२०२२
६) मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या दि.१४.०२.२०२४ च्या संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये कोविड-१९ महामारीमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे प्राणवायू (Medical Oxygen) ची आवश्यकता व निकड निर्माण झाली होती. त्यावेळी राज्यामध्ये एकूण १३०० मे. टन प्रतिदिन प्राणवायू (LMO) ची निर्मिती होत होती. तथापि, मागणी १८०० मे. टन इतकी होती. सदरची निर्मिती राज्यातील स्थापित ३२ घटकांमार्फत करण्यात येत होती. त्यावेळी राज्यामध्ये होणारी प्राणवायू निर्मिती ही अपूरी पडत असल्याने तसेच कोविड-१९ ची तिसरी लाट सुध्दा पुढे येवू शकेल आणि त्याची तीव्रता आणखी जास्त असेल असे मत तज्ञांनी व्यक्त केलेले असल्यामुळे राज्यातील प्राणवायू पुरवठयाची मागणी ५०० मे. टन प्रतिदिन इतकी वाढण्याची शक्यता विचारात घेऊन, त्यानुषंगाने राज्यामध्ये लवकरात लवकर प्राणवायू निर्मिती प्रकल्प कार्यान्वित व्हावेत, या करीता संदर्भ क्र. १ येथील दि.२१.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये **मिशन ऑक्सिजन स्वावलंबन अंतर्गत राज्यामध्ये नव्याने (नवीन तसेच विस्तारिकरण)** Oxygen Manufacturing along with Cylinder filling facility (LMO)u **प्रकल्प उभारण्याकरीता विशेष प्रोत्साहने अनुज्ञेय करण्याबाबतचे** धोरण जाहीर करण्यात आले. सदर शासन निर्णयान्वये स्थापित घटकांना उद्योग संचालनालयाच्या दि.२०.१२.२०१८ च्या मार्गदर्शक तत्वे व दि.०९.०६.२०२१ च्या परिपत्रकानुसार विविध लाभ अनुज्ञेय करण्यात आलेले आहेत. संदर्भ क्र. ३ येथील शुध्दीपत्रकानुसार, घटकांना प्रकल्प उभारणी करताना येणाऱ्या अडचणी लक्षात घेऊन गुंतवणूक कालावधी वाढवून देण्यात आला आहे. तसेच दि.२१.०५.२०२१ च्या शासन निर्णयात काही बाबींचा समावेश करण्याचे राहून गेल्याने संदर्भ क्र. ४ येथील दि.०२.०२.२०२२ रोजी शासन पूरक पत्र निर्गमित करण्यात आले आहे.

ऑक्सिजन निर्मिती करणाऱ्या घटकांना, कोरोनाच्या दोन्ही लाटेमुळे औद्योगिक क्षेत्रात निर्माण झालेली अस्थिरता, प्रकल्प उभारण्यासाठी आवश्यक जमिनीची कमतरता, महाराष्ट्र

औद्योगिक विकास महामंडळाकडून भूखंड संपादनासाठी आवश्यक प्रक्रिया पूर्ण करण्यासाठी लागणारा कालावधी, भांडवल उभारणीसाठी वित्तीय संस्था यांचेकडील प्रक्रिया या सर्व बाबींमुळे प्रकल्प उभारणीसाठी अडचणी येत असल्याचे विविध उद्योग घटकांनी त्यांचे निवेदनाद्वारे/ पत्रांव्दारे शासनाच्या निदर्शनास आणून दिलेले आहे. त्यानुषंगाने मिशन ऑक्सिजन स्वावलंबन योजनेतंर्गत उत्पादक उद्योगांना उत्पादनात जाण्यासाठी विहित करण्यात आलेल्या कालावधीस मुदतवाढ मिळणेबाबत घटकांकडून तगादा लावण्यात येत आहे. यामुळे मिशन ऑक्सिजन स्वावलंबन अंतर्गत उत्पादन उद्योगांना उत्पादनात जाण्यासाठी विहित करण्यात आलेल्या कालावधीस मुदतवाढ देण्याबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्याबाबत उद्योग संचालनालयाने संदर्भ क.४ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. त्यानुसार प्रस्तुत योजनेतंर्गत उत्पादक उद्योगांना उत्पादनात जाण्यासाठी विहित करण्यात आलेल्या कालावधीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मिशन ऑक्सिजन स्वावलंबन अंतर्गत राज्यामध्ये नव्याने (नवीन तसेच विस्तारीकरण) Oxygen Manufacturing along with Cylinder filling facility (LMO) प्रकल्प उभारण्याकरीता विशेष प्रोत्साहने अनुज्ञेय करण्याबाबतचे धोरण दि.२१.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक **"अ व ब"** मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

**परिच्छेद अ (१)** MSME प्रवर्गातील रु.५० कोटी पर्यन्त स्थिर भांडवली गुंतवणुक असलेले प्रकल्प यांना विशेष प्रोत्साहने देण्याकरीता उत्पादनात जाण्याची मुदत दि.३१.०३.२०२२ ऐवजी दि.३१.०३.२०२३ पर्यंन्त वाढविण्यात येत आहे.

**परिच्छेद अ (२)** ५० मेट्रीक टन किंवा त्यावरील प्रकल्पांना उत्पादनात जाण्याची मुदत दि.३०.०६.२०२२ ऐवजी दि.३०.०६.२०२३ पर्यन्त वाढवून देण्यात येत आहे. अशा प्रकल्पांना प्रस्तुत योजनेतंर्गत नमूद केलेली प्रोत्साहने अनुज्ञेय राहतील.

**परिच्छेद अ (४)** पात्र घटकांचा गुंतवणुक कालावधी दि. ०१.०४.२०२१ पासुन पुढील २ वर्षा ऐवजी ३ वर्ष एवढा अनुज्ञेय राहील.

**परिष्छेद ब (८)** नवीन किंवा विस्तारीकरणांतर्गत स्थापन होणारे सिलेंडर उत्पादन घटक जे दि.३१.१२.२०२१ ऐवजी दि.३१.१२.२०२२ पूर्वी उत्पादनात गेले असतील, असे घटक सदर धोरणांतर्गत प्रोत्साहने मिळण्यासाठी पात्र असतील.

२. उक्त नमुद निकष वगळता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमुद करण्यात आलेल्या अटी व शर्ती आहे तशा लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय हा मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या दि.१४.०२.२०२४ रोजी संपन्न झालेल्या ६ व्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०२४०४०८१५०६३६८८१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD SOPANRAO MENDHE

Digitally signed by VINOD SOPANRAO MENDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6CAF7EAF9A975C60BD4278CDB26344D74E2548D2175C80BA946EF0383ABE5111, cn=VINOD SOPANRAO MENDHE
Date: 2024.04.08 15:20:52 +05'30'

**( विनोद मेंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव (५ प्रत्र)
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव (५ प्रती)
३. मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव (५ प्रती)
४. सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
६. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
७. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१०.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
१३.विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
१४.व्यवस्थापकीस संचालक, महावितरण, प्रकाशगड,वांद्रे (पू), मुंबई.
१५.आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६.सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१७.संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, वांद्रे (पू), मुंबई
१८.उद्योग सह संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई /मैत्री कक्ष, मुंबई
१९. वित्त विभाग (व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
२०. आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाचे, मंत्रालय, मुंबई
२२.उद्योग विभागातील सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी
२३.निवड नस्ती (उद्योग-८)